**उपसंचालक, आरोग्य सेवा,नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट अ यांची ७८ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदआ २०१९ /प्र.क्र.११६/आरोग्य-३**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक : १३ डिसेंबर, २०१९

वाचा -

1) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक - पदआ २०१९/प्र.क्र.११६/आरोग्य -३, दिनांक- १५.१०.२०१९.**
2) **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/७-अ/टे-८/अस्थाई पदे/५३७८/२०१९, दिनांक- ०३.१२.२०१९.**

**शासन निर्णय-**

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील नाशिक, धुळे, जळगांव, नंदूरबार व अहमदनगर या ५ जिल्हयातील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ च्या एकूण १२६ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर राज्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी अतिरिक्त मनुष्यबळाची पदनिर्मिती शासन निर्णय दि.१७.०१.२०१३, दि.०२.०१.२०१७, दि.१६.०२.२०१८, दि.२३.०५.२०१८ व दि.०६.०६.२०१९ अन्वये पदनिर्मिती करण्यात आली आहे. त्या पदांनाही मुदतवाढ देणे आवश्यक आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये नाशिक, धुळे, जळगांव, नंदूरबार व अहमदनगर या ५ जिल्हयातील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील सदर वैद्यकीय अधिकारी गट-अ च्या सदर ७८ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१९-२०२० या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**<u>१) मागणी क्रमांक-आर-१</u>**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - रुग्णालये व दवाखाने
०१ (चार) - गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१)

**<u>२) मागणी क्रमांक-आर-१</u>**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - रुग्णालये व दवाखाने
००१ (चार) - गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ५०४१)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक २१.०२.२०१९ व दिनांक- ११.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१३१११३१२३५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2019.12.13 15:19:24 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.

५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई..

६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.

७. जिल्हा शल्य चिकित्सक, नाशिक/धुळे/ जळगांव/नंदूरबार/अहमदनगर.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/धुळे/ जळगांव/नंदूरबार/अहमदनगर.

९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

१०.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.

११.निवडनस्ती (आरोग्य-३)